“मुख्यमंत्री तीर्थ दर्शन योजना” या योजनेतील सुधारणांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- ज्येष्ठना-२०२४/प्र.क्र.१८९/सामासु**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२
दिनांक :- ०८ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :** १) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- ज्येष्ठना २०२४ /प्र.क्र.१८९ /सामासु, दि. १४ जुलै, २०२४.
२) आयुक्त, समाजकल्याण महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र.सकआ /मावक /ज्येष्ठना/तीर्थ द.यो/२०२४-२५/का-१२/८५४ दि. ३१ जुलै, २०२४
३) आयुक्त, समाजकल्याण महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र.सकआ/ मावक/ ज्येष्ठना / तीर्थ द.यो/२०२४-२५/का-१२/८७१ दि. ५ ऑगस्ट, २०२४

**प्रस्तावना:-**

राज्यातील सर्व धर्मियांमधील ज्येष्ठ नागरिक जे ६० वर्षे किंवा त्याहून अधिक वयाचे आहेत, त्यांना भारतातील तीर्थक्षेत्रांना भेट देण्याची इच्छा पूर्ण करण्यासाठी **"मुख्यमंत्री तीर्थ दर्शन योजना"** सुरु करण्याबाबत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने सादर केलेल्या प्रस्तावास दि. ११ जुलै, २०२४ रोजीच्या मा. मंत्रिमंडळ बैठकीमध्ये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार महाराष्ट्र राज्यात **"मुख्यमंत्री तीर्थ दर्शन योजना"** सुरु करण्यास दि. १४ जुलै, २०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी दि. ३१ जुलै, २०२४ व दि. ०५ ऑगस्ट, २०२४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून दि. १४ जुलै, २०२४ च्या शासन निर्णयामधील नमूद काही निकषामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने **"मुख्यमंत्री तीर्थ दर्शन योजना"** या योजनेच्या दि. १४ जुलै, २०२४ रोजीच्या शासन निर्णयामध्ये अंशतः सुधारणा करण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

"मुख्यमंत्री तीर्थ दर्शन योजना" या योजनेच्या दि. १४ जुलै, २०२४ रोजीच्या शासन निर्णयामध्ये पुढीलप्रमाणे अंशतः सुधारणा करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | शासन निर्णय दि. १४.०७.२०२४ मधील नमूद निकष | सुधारीत निकष |
|---|---|---|
| १. | **७. सदर योजनेमध्ये लाभ मिळण्याकरिता खालीलप्रमाणे कागदपत्रे सादर करणे आवश्यक आहेत :-**<br>**अ. क्र. (१)** योजनेच्या लाभासाठी ऑनलाईन अर्ज.<br>**अ.क्र. (४)** सक्षम प्राधिकारी यांनी दिलेला कुटुंब प्रमुखांचा उत्पन्नाचा दाखला (वार्षिक उत्पन्न रु. २.५० लाखापर्यंत असणे अनिवार्य) किंवा पिवळे / केशरी रेशनकार्ड | **७. सदर योजनेमध्ये लाभ मिळण्याकरिता खालीलप्रमाणे कागदपत्रे सादर करणे आवश्यक आहेत :-**<br>**अ. क्र. (१)** योजनेच्या लाभासाठी **दि. ३१ ऑक्टोबर, २०२४ पूर्वी ऑफलाईन व तद्नंतर** ऑनलाईन **अर्ज**<br>**अ.क्र. (४)** सक्षम प्राधिकारी यांनी दिलेला कुटुंब प्रमुखांचा उत्पन्नाचा दाखला (वार्षिक उत्पन्न रु. २.५० लाखापर्यंत असणे अनिवार्य) **किंवा अंत्योदय अन्न योजना (AAY)/ प्राधान्य कुटुंब योजना (PHH)/ वार्षिक उत्पन्न रु. २.५० लाखाच्या आत असलेले मात्र प्राधान्य कुटुंब नसलेले (NPH) शिधापत्रिकाधारक.** |

| | | |
|---|---|---|
| २. | **८. रेल्वे प्रवास तसेच बस प्रवासासाठी एजन्सी तथा टूरिस्ट कंपन्यांची निवड -:**<br>सदर योजनेंतर्गत रेल्वे तथा बस प्रवासाचे आयोजन करण्यासाठी अधिकृत टूरिस्ट कंपन्या तसेच रेल्वे प्रवासासाठी IRCTC समकक्ष अधिकृत असलेल्या नोंदणीकृत कंपन्यांची निवड विहित निविदा प्रक्रियेद्वारे करण्यात येईल . | **८. प्रवासासाठी एजन्सी तथा टूरिस्ट कंपन्यांची निवड -:**<br>सदर योजनेंतर्गत विविध दळणवळणाच्या साधनांद्वारे प्रवासाचे आयोजन करण्यासाठी अधिकृत टूरिस्ट कंपन्या तसेच IRCTC किंवा समकक्ष अधिकृत असलेल्या नोंदणीकृत कंपन्यांची निवड विहित नियमांचे निविदा प्रक्रियेचे पालन करुन करण्यात येईल. |
| ३. | **९. लाभार्थ्यांची निवड :-**<br>**अ.क्र. १.** प्रत्येक ठिकाणच्या प्रवासासाठी जिल्हानिहाय कोटा निश्चित केला जाईल, ज्यामध्ये अर्जदारांच्या संख्येसह त्या जिल्ह्याच्या लोकसंख्येच्या प्रमाणात अधिभार देऊन कोटा निश्चित केला जाईल. विहित कोट्यापेक्षा जास्त अर्जांच्या उपलब्धतेवर आधारित लॉटरीद्वारे (लॉट्सचे संगणकीकृत ड्रॉ) प्रवाशांची निवड केली जाईल. कोट्यातील १०० टक्के अतिरिक्त लोकांसाठी प्रतिक्षा यादी देखील तयार केली जाईल.<br>**अ.क्र. ३.** निवडलेले प्रवासी आणि प्रतीक्षा यादी विभागाच्या पोर्टलवर, जिल्हाधिकारी कार्यालयावर आणि समाजकल्याण विभागाच्या सहाय्यक आयुक्त कार्यालयाच्या सूचना फलकावर आणि योग्य वाटेल अशा इतर माध्यमांद्वारे प्रसारित केली जाईल.<br>**अ.क्र. ५.** जर पती-पत्नीने स्वतंत्रपणे अर्ज केला असेल आणि एकाची लॉटरीत निवड झाली असेल आणि दुसऱ्या जोडीदाराची लॉटरीत निवड झाली नसेल, तर आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे त्यांना किंवा तिला यात्रेवर पाठवण्याचा निर्णय घेऊ शकतील. | **९. लाभार्थ्यांची निवड :-**<br>**अ.क्र.१.** प्रत्येक ठिकाणच्या प्रवासासाठी जिल्हानिहाय कोटा निश्चित केला जाईल, ज्यामध्ये अर्जदारांच्या संख्येसह त्या जिल्ह्याच्या लोकसंख्येच्या प्रमाणात अधिभार देऊन कोटा निश्चित केला जाईल. विहित कोट्यापेक्षा जास्त अर्जांच्या उपलब्धतेवर आधारित पारदर्शक पध्दतीने लॉटरीद्वारे प्रवाशांची निवड केली जाईल. कोट्यातील १०० टक्के अतिरिक्त लोकांसाठी प्रतिक्षा यादी देखील तयार केली जाईल. **मात्र दि. ३१ ऑक्टोबर, २०२४ पर्यंत महाराष्ट्र राज्यातील प्रत्येक जिल्ह्याकरीता कमाल १००० (एक हजार) पात्र लाभार्थ्यांचा कोटा निश्चित करण्यात येत असून सदर कोट्याच्या कमाल मर्यादेत तसेच प्रति लाभार्थी रु. ३०,०००/- (रुपये तीस हजार) च्या कमाल मर्यादेत शासनाने दि. १४.०७.२०२४ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या तीर्थक्षेत्रांमधून तीर्थदर्शन यात्रा (टूर पॅकेज) निश्चित करण्याचे अधिकार जिल्हास्तरीय समितीस असतील.**<br>**अ.क्र. ३.**निवडलेले प्रवासी आणि प्रतीक्षा यादी विभागाच्या पोर्टलवर **(दि. ३१ ऑक्टोबर, २०२४ नंतर)** जिल्हाधिकारी कार्यालय आणि समाजकल्याण विभागाच्या सहाय्यक आयुक्त कार्यालयाच्या सूचना फलकावर आणि योग्य वाटेल अशा इतर माध्यमांद्वारे प्रसारित केली जाईल.<br>**अ.क्र. ५.** जर पती-पत्नीने स्वतंत्रपणे अर्ज केला असेल आणि एकाची लॉटरीत निवड झाली असेल आणि दुसऱ्या जोडीदाराची लॉटरीत निवड झाली नसेल, तर **जिल्हास्तरीय समिती** त्यांना किंवा तिला यात्रेवर पाठवण्याचा निर्णय घेऊ शकतील. |

| | | |
|---|---|---|
| ४. | **१५. अर्ज करण्याची प्रक्रिया :-**<br>योजनेचे अर्ज पोर्टल/ मोबाईल ॲपद्वारे/ सेतू सुविधा केंद्राव्दारे ऑनलाईन भरले जाऊ शकतात. त्यासाठी पुढील प्रक्रिया विहित केलेली आहे:-<br>**अ.क्र. १)** पात्र ज्येष्ठ नागरिकास या योजनेसाठी ऑनलाईन अर्ज करता येईल.<br>**अ.क्र. २)** ज्यांना ऑनलाईन अर्ज सादर करता येत नसेल, त्यांच्यासाठी अर्ज भरण्याची सुविधा सेतू केंद्रात उपलब्ध असेल. | **१५. अर्ज करण्याची प्रक्रिया :-**<br>योजनेचे अर्ज **दि. ३१ ऑक्टोबर, २०२४ पूर्वी ऑफलाईन पध्दतीने व तद्नंतर** योजनेचे अर्ज पोर्टल/मोबाईल ॲपद्वारे ऑनलाईन भरले जाऊ शकतात. त्यासाठी पुढील प्रक्रिया विहित केलेली आहे:-<br>**अ. क्र. १)** पात्र ज्येष्ठ नागरिकास या योजनेसाठी दि. ३१ ऑक्टोबर, २०२४ पूर्वी ऑफलाईन पध्दतीने आणि तद्नंतर ऑनलाईन पध्दतीने अर्ज करता येईल.<br>**अ.क्र. २)** दि. ३१ ऑक्टोबर, २०२४ पूर्वी ज्यांना ऑफलाईन अर्ज सादर करता येत नसेल, त्यांच्यासाठी अर्ज भरण्याची सुविधा सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण कार्यालयात उपलब्ध असेल. |
| ५. | **१६. तात्पुरत्या यादीचे प्रकाशन :-**<br>अर्ज प्राप्त झाल्यानंतर, पात्र अर्जदारांची तात्पुरती यादी पोर्टल/ॲपवर जाहीर केली जाईल. | **१६. तात्पुरत्या यादीचे प्रकाशन :-**<br>ऑफलाईन अर्ज प्राप्त झाल्यानंतर पात्र अर्जदारांची तात्पुरती यादी जिल्हाधिकारी कार्यालयाच्या आणि समाजकल्याण विभागाच्या सहाय्यक आयुक्त कार्यालयाच्या सूचना फलकावर जाहीर केली जाईल. आणि ऑनलाईन अर्ज प्राप्त झाल्यानंतर, पात्र अर्जदारांची तात्पुरती यादी पोर्टल/ॲपवर जाहीर केली जाईल. |
| ६. | **१७. मूळ अर्जदारासह जीवनसाथी/ सहाय्यकाच्या प्रवासासंबंधीच्या तरतुदी :-**<br>**अ.क्र. २.** ७५ वर्षावरील अर्जदाराच्या जोडीदाराचे वय ६० वर्षांपेक्षा कमी असले तरीही प्रवासी सहाय्यक अर्जदारासोबत प्रवास करू शकेल.<br>**अ.क्र. ५.** सहाय्यकाचे किमान वय २१ वर्षे ते कमाल ५० वर्षे असावे. एखादा मदतनीस प्रवासात घेतल्यास,त्याला देखील त्याच प्रकारच्या सुविधा मिळतील ज्या प्रवाशाला परवानगी आहे. सहाय्यक शारीरिकदृष्ट्या निरोगी आणि प्रवासासाठी तंदुरुस्त असावा. | **१७. मूळ अर्जदारासह जीवनसाथी/सहाय्यकाच्या प्रवासासंबंधीच्या तरतुदी :-**<br>**अ.क्र.२.** ७५ वर्षावरील अर्जदाराच्या जीवनसाथी किंवा सहाय्यक यांचे वय ६० वर्षांपेक्षा कमी असले तरीही जीवनसाथी किंवा सहाय्यक यापैकी एक अर्जदारासोबत प्रवास करू शकेल.<br>**अ.क्र. ५.** सहायकाचे किमान वय २१ वर्षे ते कमाल ५० वर्षे असावे.एखादा सहायक प्रवासात घेतल्यास, त्याला देखील त्याच प्रकारच्या सुविधा मिळतील ज्या प्रवाशाला परवानगी आहे. सहाय्यकाने शारीरिकदृष्ट्या निरोगी आणि प्रवासासाठी तंदुरुस्त असल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहिल. |
| ७. | **२१. वेबसाईट तयार करणे:-**<br>सदर योजनेची नवीन वेबसाईट बनवण्याचे काम महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून करुन घेण्यात येईल. | **२१. वेबसाईट / पोर्टल तयार करणे:-**<br>सदर योजनेची नवीन वेबसाईट/**पोर्टल** बनवण्याचे काम महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून **किंवा सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्या अधिनस्त महामंडळाकडून तयार** करुन घेण्यात येईल.<br>**सदर वेबसाईट/पोर्टलद्वारे संकलित डाटा शासनाच्या मालकीचा राहील.** |

२. सदर योजनेसाठी आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. प्रस्तुत योजनेसाठी आयुक्त, समाजकल्याण, पुणे हे नोडल अधिकारी असल्याने सदर योजनेंतर्गत विविध दळणवळणाच्या साधनांद्वारे प्रवासाचे आयोजन करण्यासाठी निवड करण्यात आलेल्या एजन्सी तथा टुरिस्ट कंपन्यासोबत शासन मान्यतेने सामंजस्य करार करण्यासाठी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०८०८१७५३५०१७२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAJESH SADASHIV MANJREKAR

Digitally signed by RAJESH SADASHIV MANJREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=165bc3b66844eff888fd282269f8913cd36baadbc01bcf006e056fb7f6a93c4d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E57ADD6A85F0CF35923F0F015D8E4D4D3A72EC43AD6008F036A3AB06AA1BB85, cn=RAJESH SADASHIV MANJREKAR
Date: 2024.08.08 18:08:23 +05'30'

**( राजेश मांजरेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा.उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
७. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा.उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई
९. मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई
१०. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
१३. मा.प्रधान सचिव, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानमंडळ, मुंबई
१४. मा. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर
१५. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर
१६. सर्व विभागीय आयुक्त
१७. आयुक्त, समाजकल्याण, पुणे
१८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई
१९. सर्व पोलीस आयुक्त
२०. सर्व आयुक्त, महानगरपालिका
२१. जिल्हाधिकारी (सर्व)
२२. सर्व पोलीस अधीक्षक
२३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

२४. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक
२५. राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक
२६. सर्व प्रादेशिक उपायुक्त (समाजकल्याण विभाग)
२७. सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
२८. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
२९. सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद
३०. निवड नस्ती, सामासु